**म्हाडाच्या अत्यल्प, अल्प व मध्यम उत्पन्न गटातील सदनिकांचे चटईक्षेत्र निश्चित करण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग
## शासन निर्णय क्र.बैठक ११०९/प्र.क्र.३६/गृनिभू
## मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
## दिनांक : २६ ऑगस्ट,२००९

**वाचा :** १) शासन निर्णय (नगर विकास) क्र.टिपीबी ४३०८/७४/ प्र.क्र.११/२००८/नवि-११, दिनांक ६ डिसेंबर,२००८

२) उपाध्यक्ष, म्हाडा यांचे पत्र क्र.एमएच/सीई-२/ईई-१, दि.११ ऑगस्ट,२००९

**प्रस्तावना :**

उपरोक्त नगर विकास विभागाकडील शासन निर्णयान्वये विकास नियंत्रण नियमावलीतील ३३ (५) मध्ये सुधारणा करण्याबाबत अधिसूचना निर्गमित केली आहे. सदर अधिसूचनेच्या परिशिष्टामधील परि.४ मध्ये अत्यल्प, अल्प व मध्यम उत्पन्न गटातील सदनिकांचे चटईक्षेत्र निश्चित करण्याबाबत शासन स्वतंत्रपणे निर्णय घेईल असे नमूद करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये चटईक्षेत्र निश्चित करणेबाबत उपाध्यक्ष, म्हाडा यांचेकडून प्राप्त झालेला प्रस्ताव आणि केंद्र शासनाने "भागीदारीमधून बांधावयाच्या परवडणा-या घरांसाठी" केलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे चटईक्षेत्र सुधारण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्ताव विचारात घेऊन उपरोक्त तीन प्रवर्गांकरीता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

अत्यल्प, अल्प व मध्यम उत्पन्न गटातील सदनिकांचे चटईक्षेत्र निश्चित करण्याबाबत दिनांक ६ डिसेंबर,२००८ च्या नगर विकास विभागाच्या अधिसूचनेतील परि.४ मध्ये नमूद केल्यानुसार सदनिकांचे चटईक्षेत्र खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उत्पन्न गट | अनुज्ञेय चटई क्षेत्र (यापेक्षा जास्त नसावे) |
|---|---|---|
| १. | अत्यल्प | २७.८८ चौ.मी. |
| २. | अल्प | ४५.०० चौ.मी. |
| ३. | मध्यम | ८०.०० चौ.मी. |

उपरोक्त प्रमाणे निश्चित करण्यात आलेले चटईक्षेत्र म्हाडाच्या वसाहतींचा

(कृ.मा.प.)

पुनर्विकास, म्हाडाचे नवीन प्रकल्प तसेच म्हाडाने राबविण्याच्या केंद्र शासनाच्या विविध योजनांकरीता राज्यातील सर्व नागरी विभागांना लागू राहील.

२. सदर शासन निर्णय नगर विकास विभागाच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय आदेशाच्या दिनांकापासून लागू राहील.

४. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २००९०८२६१६३०२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-

**(सीताराम कुंटे)**

**सचिव,गृहनिर्माण, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव/सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
३. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महापालिका मार्ग, मुंबई ४०० ००१
४. मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती, गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव यांचे स्वीय सहाय्यक
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (गृ.नि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती, गृनिभू